दि.२० ऑगस्ट, २०१८ हा दिवस “सद्भावना दिवस” व दि. २० ऑगस्ट, २०१८ ते दि.५ सप्टेंबर, २०१८ हा पंधरवडा “सामाजिक ऐक्य पंधरवडा” म्हणून साजरा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः अविवि-२०१८/ प्र.क्र.६७/का.८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १० ऑगस्ट, २०१८.

**शासन परिपत्रक -**

युवा व क्रिडा मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्या निदेशानुसार दिवंगत पंतप्रधान मा.राजीव गांधी यांचा जयंती दिवस २० ऑगस्ट हा दिवस दरवर्षी “सद्भावना दिवस” म्हणून साजरा करण्यात येतो. तसेच मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांच्या कार्यालयीन ज्ञापन क्र.एफ-२८-२२/२००६-वा.एस-४, दि.१८ जुलै, २००६ अन्वये देण्यात आलेल्या निदेशास अनुसरुन, उपरोक्त सद्भावना दिवसाच्या अनुषंगाने दि. २० ऑगस्ट, २०१८ ते दि. ५ सप्टेंबर, २०१८ हा पंधरवडा “सामाजिक ऐक्य पंधरवडा” म्हणून साजरा करण्याचे शासनाने ठरविले आहे. राज्यातील विविध प्रदेशातील अनेक धर्मांच्या व अनेक भाषा बोलणाऱ्या लोकांमध्ये एकमेकाविषयी ऐक्याची भावना, सौहार्द भाव वृध्दीगंत करणे व हिंसाचार टाळणे ही प्रमुख उदिष्टे हा पंधरवडा साजरा करण्यामागे आहेत.

२. दि. २० ऑगस्ट, २०१८ हा “सदभावना दिवस” म्हणून साजरा करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

अ) मंत्रालयाच्या प्रांगणात दि. २० ऑगस्ट, २०१८ रोजी “सदभावना दिवस” साजरा करण्यात यावा व सर्व उपस्थितांना सदभावना दिवसाची प्रतिज्ञा घेण्यास सांगण्यात यावे, तसेच या दिवशी सद्भावना शर्यतही आयोजित करण्यात यावी. याबाबत कार्यपध्दती कशी असावी याची प्रत आणि प्रतिज्ञेची प्रत सोबत जोडली आहे.

ब) बृहन्मुंबईत लोकांच्या विशेषत: युवकांच्या सहभागाने संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य यांनी सद्भावना या विषयावर समुहगान आणि सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करावेत.

क) महसूल विभागाच्या आयुक्तांनी सद्भावना शर्यत आयोजित करण्यासह त्यांच्या कार्यालयातून सद्भावना दिवसाची प्रतिज्ञा घेण्याचा कार्यक्रम आयोजित करावा. (शर्यतीची कार्यपध्दती आणि प्रतिज्ञेचा नमुना सोबत जोडला आहे.)

ड) राज्यातील सर्व शासकीय कार्यालये, जिल्हांच्या मुख्यालयात व संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली सर्वधर्म प्रार्थना सभा घेण्यात यावी व सर्व उपस्थितांना सद्भावना शपथ घेण्यास सांगण्यात यावे. तसेच सद्भावना शर्यत आयोजित करावी (नमुना सोबत जोडला आहे). तसेच युवकांच्या सहभागाने सद्भावना या विषयावर समुहगान आणि सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करावेत.

इ) विद्यापीठे, महाविद्यालये आणि शाळांमध्ये सुध्दा अशाच तऱ्हेचे कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत. या विषयीचे आवश्यक ते आदेश शालेय शिक्षण तसेच उच्च व तंत्रशिक्षण विभाग, वैद्यकीय शिक्षण विभागाने संबधितांना द्यावेत. नेहरू युवा केंद्र, भारत स्काऊट आणि गाईडस व राष्ट्रीय सेवा योजना यांना देखील कार्यक्रमामध्ये सहभागी करून घेण्यात यावे.

३. याशिवाय दिनांक २० ऑगस्ट, २०१८ ते ५ सप्टेंबर २०१८ हा पंधरवडा "सामाजिक ऐक्य पंधरवडा" म्हणून राज्यात साजरा करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

अ) सामाजिक ऐक्याचा संदेश प्रसृत करण्यासाठी मानवी साखळी (Human Chain)सारखे कार्यक्रम राज्यातील जिल्हा मुख्यालयात, संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करावेत.

आ) जिल्हाधिकाऱ्यांनी युवक परिषदा आयोजित करून त्यामध्ये जिल्हातील प्रख्यात स्वातंत्र्य सैनिकांना भाषण देण्यासाठी निमंत्रित करावे.

इ) सदर पंधरवडयात जिल्हांमध्ये जिल्हाधिकाऱ्यांनी इतर सांस्कृतिक कार्यक्रम सुध्दा आयोजित करावेत.

ई) संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर पंधरवडयामध्ये बृहन्मुंबईत सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करावेत.

४. उपरोक्त "सद्भावना दिवस" व "सामाजिक ऐक्य पंधरवडा" या कार्यक्रमांच्या प्रसिध्दीसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने दूरदर्शन व आकाशवाणीच्या स्थानिक अधिकाऱ्यांनी संपर्क साधून कार्यक्रमांना पुरेशी प्रसिध्दी द्यावी.

५. उपरोक्त कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी आवश्यक त्या सर्व उपाययोजना करण्याची खबरदारी सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी घ्यावी व कार्यक्रम पार पाडल्यानंतर शासनास त्याचा अहवाल सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१०१५४१३१४०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.08.10 15:43:44 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४) मा.मुख्य सचिव,

५) अपर मुख्य सचिव (का.२९),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई

६) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव /सचिव मंत्रालय,मुंबई,

७) अपर मुख्य सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

९) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१२) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय,मुंबई

१३) सर्व मंत्रालयीन विभाग,

१४) सर्व विभागीय आयुक्त,

१५) कुलसचिव, सर्व विद्यापीठे

१६) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई

१७) पोलीस महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,मुंबई

१८) सर्व पोलिस आयुक्त,

१९) सर्व जिल्हाधिकारी,

२०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद

२१) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई (प्रसिध्दीसाठी)

२२) कक्ष अधिकारी,माहिती व तत्रंज्ञान महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई (२ प्रती वेबसाईट)

२३) कक्ष अधिकारी,सामान्य प्रशासन विभाग/का.२९,मंत्रालय,मुंबई यांना कार्यक्रम आयोजनाच्या विनंतीसह

२४) निवड नस्ती (का.८)

## <u>सहपत्र</u>

## <u>सद्भावना दिवस आयोजित करण्यासाठी तपशिलवार सूचना</u>

## सद्भावना शर्यतीचे उद्दिष्ट

**सद्भावना शर्यतीचे उद्दिष्ट पुढीलप्रमाणे आहे :-**

**अ)** सर्व वयोगटांतील लोकांमध्ये शारिरीकदृष्टया निरोगी राहण्याची सवय निर्माण करणे.
**ब)** सर्व वयाच्या, सर्व वर्गाच्या आणि सर्व धर्माच्या सर्व भाषिकांच्या लोकांमध्ये एक प्रकारचा बंधुभाव व सलोखा वाढीस लावणे.

या सर्व गोष्टी साध्य करण्यासाठी समाजाच्या सर्व स्तरावरील लोकांना, मग ते कोणत्याही वयोगटातील असले, महिला अथवा पुरुष असले तरी, या शर्यतीमध्ये भाग घेण्यासाठी उत्तेजन देणे इष्ट ठरेल. सद्भावना शर्यतीत, महत्वाची गोष्ट सहभाग ही आहे. स्पर्धा नव्हे. या शर्यतीचे घोषवाक्य **भारत - निरोगी आणि समर्थ** हे आहे.

### <u>शर्यत आयोजित करण्याची कार्यपध्दती.</u>

सर्वसाधारणपणे ही शर्यत ठराविक ठिकाणी सुरु झाली पाहिजे आणि ठराविक ठिकाणी संपली पाहिजे, हे अंतर साधारणत: ३ ते ५ किलोमीटर असावे. जमिनीचा चढउतार व शर्यतीच्या ठिकाणचे हवामान याप्रमाणे त्यात थोडाफार बदल करावा. तथापि, भाग घेणाऱ्या लोकांची संख्या मोठी असेल तर शर्यती वेगवेगळया ठिकाणापासून सुरु करता येतील आणि एकाच ठिकाणी संपविता येतील, भाग घेणाऱ्या लोकांची एकूण संख्या लक्षात घेऊन साधारण दोनशे ते अडीचशे लोकांना तुकडी तुकडीने हिरवा झेंडा दाखववा. प्रत्येक प्रारंभाच्या ठिकाणी एक छोटा चबुतरा असावा आणि त्यावरून अतिविशेष व्यक्तीने, वेगवेगळया तुकडयांना हिरवा झेंडा दाखववा. प्रत्येक प्रारंभाच्यावेळी, वेगवेगळया तुकडयांमध्ये लोकांना विभागता यावे या दृष्टीने, त्यांना सूचना देण्यासाठी ध्वनीक्षेपण सामग्रीची व्यवस्था करावी.

### <u>पाण्याच्या आणि वैद्यकीय सुविधा</u>

शर्यतीच्या मार्गावर आणि शर्यत संपते त्या ठिकाणी पिण्याच्या पाण्याची तसेच प्रथमोपचाराची पुरेशी सुविधा असावी. भाग घेणाऱ्या २०० लोकांमध्ये पाण्याचे पिंप, कमीत कमी २५ पेले व पुरेसे जग उपलब्ध ठेवावेत. वैद्यकीय मदतीसाठी योग्य व्यवस्था असावी.

### <u>आयोजकांसाठी प्रशिक्षण वर्ग</u>

या शर्यतीमध्ये, वृध्द माणसे, स्त्रिया, लहान मुले असे सर्वच भाग घेतील अशी अपेक्षा आहे. त्यादृष्टीने आयोजनात भाग घेणाऱ्या अधिकाऱ्यांसाठी सूचनावजा एक शैक्षणिक सत्र प्रत्यक्ष शर्यतीच्या दोन दिवस आधी घेणे इष्ट ठरेल. त्यामुळे व्यवस्थेबाबत काही शंका असतील तर त्यांचा उलगडा होईल.

### <u>संकीर्ण</u>

शर्यतीत भाग घेणाऱ्यांनी शक्यतो, धावताना घालतात ते बूट घालावेत, चपला शक्यतो टाळाव्यात. शर्यतीत भाग घेणाऱ्यांना शर्यतीच्या पोषाखातच हजर राहण्यास सांगावे. त्यामुळे कपडे बदलण्याच्या खोल्या किंवा चीजवस्तू ठेवण्यासाठी जागा अशी जास्तीची प्रशासकीय व्यवस्था करावी लागणार नाही. मुलांना खाण्याचे डबे न आणण्याविषयी सूचना द्याव्यात.

## प्रसिध्दी

लोकांनी मोठया प्रमाणावर सहभाग घ्यावा या दृष्टीने जनसंपर्क माध्यमातून, भित्तीपत्रकांच्याद्वारे, हँडबिले इ. वाटून भरपूर प्रसिध्दी देण्यात यावी. शिवाय, शर्यतीच्या तारखेच्या दोन दिवस आधी एक पत्रकार परिषद आयोजित करण्यात यावी. या परिषदेत शासनाच्या सचिवांनी किंवा इतर वरिष्ठ अधिकाऱ्यांनी सूचना द्याव्यात. शर्यतीचा मार्ग, तारीख व वेळ प्रसिध्द करण्यात यावी. वाहतुकीसाठी पर्यायी मार्ग कोणते ते देखील सांगावेत.

## शर्यतीचे आयोजन व तांत्रिकदृ ष्ट्या संचलन

शर्यत आयोजित करण्यासाठी व तांत्रिकदृष्टया तिच्या संचालनासाठी पुढील मार्गदर्शक तत्वे सांगण्यात येत आहेत :-

(१) शर्यती आयोजित करण्यास जबाबदार अधिकारी शक्यतो एकाच ठिकाणचे घ्यावेत म्हणजे जादा खर्च टाळता येईल. शर्यतीच्या संचालनाच्या पध्दतीबाबत त्यांना अत्यंत स्पष्ट अशी कल्पना असावी. त्यांना सूचना देण्यासाठी ३ दिवस आधीच सर्व संघटक अधिकाऱ्यांची बैठक बोलवावी.

(२) शर्यतीच्या प्रारंभाचे ठिकाण मोकळया मैदानावर असणे आवश्यक आहे. कारण त्या ठिकाणी भाग घेणारे नीट जमू शकतात व त्यांचे २०० ते २५० जणांचे गट करता येतात. एका गटाला एका वेळी धावयाला सांगता येईल व दोन गटांमध्ये साधारण २ ते ३ मिनिटांचा कालावधी वाजवी ठरेल. अशा रितीने गडबड-गोंधळ व चेंगराचेंगरी टाळावी. शर्यतीच्या प्रारंभाचे आदर्श ठिकाण सांगावयाचे झाल्यास गर्दीचे रस्ते किंवा गर्दीचे चौक यापासून दूर, एखादे स्टेडियम त्यासाठी योग्य ठरेल, फार मोठया संख्येने लोकांनी भाग घेतल्यास, शर्यत वेगवेगळया प्रारंभ स्थानापासून सुरु करावी व गर्दी टाळावी.

(३) शर्यत संपण्याचे ठिकाण देखील मोकळया मैदानावरच असावे. शक्यतो एखादे स्टेडियम किंवा मोठे क्रीडांगण निवडणे जास्त चांगले. तेथे भाग घेणाऱ्या लोकांना शर्यतीनंतर आपापल्या वाटेने जाण्यासाठी पुरेशी जागा मिळते. ही शर्यत स्पर्धात्मक नसल्यामुळे शर्यत संपते त्या ठिकाणी हद्द आखण्याची किंवा फीत बांधण्याची गरज नाही. गडबड गोंधळ टाळण्यासाठी **ही शर्यत म्हणजे स्पर्धा नव्हे** हे वारंवार घोषित करण्यात यावे.

(४) धावणाऱ्यांच्या पुढे मोटार सायकलवर / स्कूटरवर / मोटार वाहनातून पथदर्शक पाठविण्यात यावेत. या पथदर्शक वाहनांनी लाल झेंडा दाखवत जावे आणि शर्यतीचा मार्ग मोकळा ठेवावा. धावणारे जरी रस्त्याच्या एकाच बाजूने धावत असले तरीसुध्दा रस्त्याच्या दोन्ही बाजूची वाहनांची ये-जा थांबवणे आवश्यक आहे.

(५) शर्यतीच्या मार्गावर रहदारीचे नियंत्रण करण्यासाठी योग्य त्या संख्येने मोटार सायकली / स्कूटर / मोटार वाहने तैनात करावीत. त्यांनी धावणाऱ्यांकडे लक्ष ठेवावे. कोठेही कोंडी किंवा गर्दी झाल्यास, ती मोकळी करावी.

(६) सहभागी होणाऱ्या लोकांची संभाव्य संख्या व शर्यतीचे अंतर लक्षात घेऊन योग्य संख्येने रुग्णवाहिका, डॉक्टर व वैद्यकीय सामग्री उपलब्ध करून द्यावी. कमीत कमी एक रुग्णवाहिका तरी असेल व ती शर्यतीच्या पाठीमागून जाईल. शर्यतीच्या मार्गावर आणि शर्यत संपते त्या ठिकाणी प्रथमोपचार केंद्र देखील तैनात करता येतील.

(७) शर्यतीचा मार्ग काळजीपूर्वक ठरवला पाहिजे. शर्यतीत धावणाऱ्या सर्व व्यक्ती, आयोजक अधिकारी व वाहतूक पोलीस या सर्वांना रस्त्याचा नकाशा पुरवण्यात यावा. सर्वसाधारणपणे अति दाट वाहतुकीचे रस्ते, बाजारपेठा, शाळा, व्यापारी केंद्र हा भाग वगळावा.

(८) रस्त्याच्या चौकांमध्ये तसेच सर्व मोठया वाहतूक चौकामध्ये व रस्ते ओलांडणीच्या ठिकाणी पुरेशा संख्येने वाहतूक पोलीस ठेवण्यात यावेत. शर्यत चालू होण्यापूर्वी अर्धा तास सर्व वाहतूक थांबवण्यात यावी. पहिला स्पर्धक शेवटच्या बिंदूला पोचल्यानंतर निदान अर्ध्या तासाने रस्ते वाहतूकीला खुले करावेत.

(९) ज्यावेळी मार्गावरील वाहतूक कमीत कमी असेल अशी वेळ शर्यतीसाठी निवडण्यात यावी. उदा. सकाळी जेवढया लवकर शक्य असेल तेवढया लवकर शर्यती घ्याव्यात.

(१०) धावण्याचे अंतर लक्षात घेऊन धावण्याच्या मार्गावर सहभागी व्यक्तींसाठी खानपान सेवा पुरेशा प्रमाणात उपलब्ध करावी. प्रत्येक पाणपोईच्या ठिकाणी पुरेसे पाणी आहे याची खातरजमा करावी. पाणी पिण्याकरिता कागदाचे कप पुरेसे आहेत याची खातरजमा करावी. पाणपोईवर निदान दोन मदतनीस असावेत. शर्यत संपते त्या ठिकाणी, पाण्याचे टँकर / लॉरी उपलब्ध ठेवावी, असे सूचविण्यात येत आहे.

(११) पथदर्शक वाहने, रुग्णवाहिका, वाहतूक पोलीस व संघटक अधिकारी या सर्वांना परस्परांशी संपर्क साधणे सहज शक्य व्हावे या दृष्टीने तसेच गर्दीवर नियंत्रण ठेवण्यासाठी शर्यतीच्या सुरुवातीस, शेवटी या मार्गावर वॉकी-टॉकी, ध्वनीक्षेपक इ. संपर्क सुविधा पुरेशा प्रमाणात द्याव्यात.

(१२) आयोजनात भाग घेणारे सर्व अधिकारी, वैद्यकीय कर्मचारी व वाहतूक पोलीस या सर्वांना शर्यतीचा सर्व तपशिल अगदी नीटपणे सांगण्यात यावा. अपघात होऊ नयेत, धावणाऱ्यांना इजा होऊ नये यादृष्टीने विशेष काळजी घेणे व दक्षता घेणे किती गरजेचे आहे ते त्यांना सांगण्यात यावे. या कारणासाठी एक विशेष बैठक बोलवावी.

(१३) धावण्याचे अंतर लक्षात घेता, जे लोक शारिरीकदृष्टया योग्य स्थितीत नाहीत हे स्पष्ट दिसत आहे किंवा त्यांचे वय शर्यतीला योग्य नाही अशा लोकांना शर्यतीत भाग घेण्यापासून परावृत्त करावे.

(१४) मार्गावर दोन्ही बाजूंना प्रेक्षकांची होणारी गर्दी टाळणे व तिच्यावर पोलीस/ स्वयंसेवक/ निमलष्करी व्यक्ती त्यांच्याकरवी कडक नियंत्रण ठेवणे अतिशय आवश्यक आहे. त्यांनी शर्यतीच्या रस्त्यावर प्रेक्षकांना प्रवेश करू देऊ नये किंवा तो रस्ता ओलांडून देऊ नये.

*************************************************

## SADBHAVANA DAY PLEDGE

"I take this solemn pledge that I will work for the emotional oneness and harmony of all the people of India regardless of caste, creed, region, religion or language. I further pledge that I shall resolve all differences among us through dialogue and constitutional means without resorting to violence."

*************************************************

## सद्भावना दिवस प्रतिज्ञा

मी अशी प्रतिज्ञा करतो / करते की, मी जात, वंश, धर्म, प्रदेश किंवा भाषा विषयक भेद न करता सर्व भारतीय जनतेचे भावनिक ऐक्य आणि सामंजस्य यासाठी काम करीन. मी आणखी अशी प्रतिज्ञा करतो / करते की, आमच्यामधील वैयक्तिक किंवा सामुहिक स्वरूपाचे सर्व प्रकारचे मतभेद मी हिंसाचाराचा अवलंब न करता विचार विनिमय करून व संविधानिक मार्गानी सोडवीन.

*************************************************